शैक्षणिक वर्ष २०२०-२१ पासून एकाच व्यवस्थापनामार्फत सुरु असलेल्या संस्था विलिन करण्यास शासन मान्यता देणेबाबत...

# महाराष्ट्र शासन

**उच्च व तंत्रशिक्षण विभाग**

**शासन निर्णय क्र.टीईएम-२०२०/प्र.क्र.९४/तांशि-४**

हुतात्मा राजगुरु चौक,मादाम कामा रोड,
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: १२ ऑक्टोबर, २०२०.

**वाचा :-** १) अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषद, नवी दिल्ली यांचे पत्र एफ.क्र.वेस्टर्न /१-७०१४६५२१९२/२०२०/ईओए, दिनांक १५/०६/२०२०

२) संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांची पत्रे क्रमांक २/ एनजीसी /२०२०/मान्यता/६८५, दि. ११/०९/२०२०

**प्रस्तावना :**

अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषद, नवी दिल्ली यांनी प्रकाशित केलेल्या APH (Approval Process Handbook) २०२०-२१ मधील २.१० नुसार एकाच व्यवस्थापनामार्फत सुरु असलेल्या संस्था विलिन (merging) करण्याची तरतूद आहे. त्यानुसार विलासराव देशमुख फौंडशन ग्रुप ऑफ इन्स्टिट्युशन्स, लातूर या संस्थेमधील अभियांत्रिकी पदविका व पदवी अभ्यासक्रमांच्या संस्था विलिन करण्यास अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषद, नवी दिल्ली यांनी मान्यता दिलेली आहे. त्याप्रमाणे संचालक, तंत्र शिक्षण यांनी वर नमूद क्रमांक २ येथील दिनांक ११/०९/२०२० रोजीच्या स्वतंत्र पत्राव्दारे या संस्थेच्या विलिनीकरणास शासन मान्यता देण्याची विनंती केली आहे.

**शासन निर्णय :**

अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषद, नवी दिल्ली यांनी मान्यता दिल्यानुसार खालील तक्त्यामध्ये नमूद केल्याप्रमाणे संस्था विलिनीकरणास पुढील अटी व शर्तीच्या अधिन राहून शासनाची मान्यता देण्यात येत आहे:-

| अ.क्र | विलीन झालेल्या संस्थांची नावे व डीटीई कोड | विलिनीकरणा नंतर संस्थेचे नाव व डीटीई कोड | विलिनीकरणानंतर चालविण्यात येणारे अभ्यासक्रम |
|---|---|---|---|
| १ | २२५४ - विलासराव देशमुख फाऊंडेशनचे, ग्रुप ऑफ इन्स्टिटयूशन्स, लातूर (पालक संस्था)<br><br>२२९० - विलासराव देशमुख फाऊंडेशनचे, व्ही.डी.एफ, स्कूल ऑफ पॉलिटेक्निक, लातूर | २२५४ - विलासराव देशमुख फाऊंडेशनचे, ग्रुप ऑफ इन्स्टिटयूशन्स, लातूर | **पदवी**<br>१.सिव्हिल इंजि.<br>२.कॉम्प्युटर इंजि.<br>३.मेकॅनिकल इंजि.<br>४.इलेक्ट्रॉनिक्स ॲन्ड टेलिकॅयुनिकेश इंजि.<br>५.इलेक्ट्रिकल इंजि.<br>**पदविका**<br>६.मेकॅनिकल इंजि.<br>७.सिव्हिल इंजि.<br>८.कॉम्प्युटर इंजि.<br>९.इलेक्ट्रॉनिक्स इंजि.<br>१०.इलेक्ट्रॉनिक्स ॲण्ड टेलिकम्युनिकेशन इंजि. |

**अटी व शर्ती :-**

१. सदर मान्यता कायम विना अनुदान तत्वावर राहील.

२. प्रस्तुत विलिनाकरणानंतरची प्रवेश क्षमता अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषद,नवी दिल्ली यांनी शैक्षणिक वर्ष २०२०-२१ करीता मंजूर केल्याप्रमाणे राहील.

३. प्रस्तुत बाबतीत अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषदेने विहित केलेल्या तसेच दिनांक २१ मे, १९८३ च्या शासन निर्णयान्वये विहित केलेल्या अटींची पूर्तता करणे संबंधित संस्थेस बंधनकारक राहील. सदर अभ्यासक्रमासाठी संस्थेचे प्रवेक्षक्षमता वर नमुद केल्याप्रमाणे राहील.

४. शासनाने विहित केलेल्या तसेच अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषदेने विहित केलेल्या सर्व अटी व शर्ती मान्य असल्याबाबत संस्थेस करारनामा करावा लागेल. तसेच संबंधित कागदपत्रांची आणि औपचारिक बाबींची पूर्तता संचालक, तंत्रशिक्षण, महाराष्ट्र राज्य यांच्या संमतीने समाधानकारकरित्या करण्यात येईल.

५. संबंधित संस्थेने संचालक, तंत्र शिक्षण यांचेकडे आवश्यक ती संचीत ठेव संयुक्त खात्यात भरुन इतर कायदेशीर बाबींची पूर्तता करावी.

६. सदर पदवी व पदव्युत्तर पदवी अभ्यासक्रमाचे प्रवेश शासनाने मान्य केलेल्या संबंधित अभ्यासक्रमाच्या प्रवेश नियमानुसार /पद्धतीनुसार करण्यात येतील.

७. शुल्क नियामक प्राधिकरणाने विहित केलेल्या शिक्षण शुल्कापेक्षा जास्त शुल्क संबंधित संस्थांनी आकारल्यास त्या संस्थांवर महाराष्ट्र एज्युकेशनल इन्स्टिट्यूशन (प्रोहिबिशन ऑफ कॅपिटेशन फी) ॲक्ट, १९८७ अनुसार कारवाई करण्यात येईल.

८. संस्थेने अभ्यासक्रम चालविण्यास पूर्णवेळ शिक्षकवृंद व इतर तांत्रिक कर्मचारी नियमाप्रमाणे नियुक्त करावेत. त्यांना नियमानुसार वेतन व भत्ते कर्मचाऱ्यांना देण्यात यावेत. तसेच शिक्षकवृंद व इतर कर्मचाऱ्यांच्या वेतन व भत्ते इत्यादीबाबत तसेच विद्यार्थ्यांकडून शासनाकडे तक्रारी आल्यास संस्थेवर कडक कारवाई करण्यात येईल.

९. संस्थेतील ग्रंथालयास आवश्यक ती पुस्तके, नियतकालिके अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषदेच्या मानकानुसार खरेदी करणे आवश्यक आहे. तसेच विद्यार्थ्यांना वाचनालयाचा पुरेपूर उपयोग होण्याच्या दृष्टीने ग्रंथालयात विद्यार्थ्यांना अभ्यासिकेची सोय करणे आवश्यक आ तसेच विद्यार्थ्यांना अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषदेच्या मानकाप्रमाणे सर्व शैक्षणिक सोयीसुविधा (उदा. प्रयोगशाळा, वाचनालय, वर्गखोल्या इ.) करणे आवश्यक आहे.

१०. रॅगिंग संदर्भात मा. सर्वोच्च न्यायालयाचे निर्देश व महाराष्ट्र प्रोहिबिशन ऑफ रॅगिंग ॲक्ट, १९९९ यांची कठोरपणे अंमलबजावणी करणेआवश्यक राहील.

११. याशिवाय संचालक, तंत्रशिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई व संबंधित विद्यापीठ यांनी घालून दिलेल्या अन्य अटी व शर्ती लागू राहतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२०१०१२१४४३४९४६०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SANJAY AUDUMBAR DHARURKAR

Digitally signed by SANJAY AUDUMBAR DHARURKAR
DN: c=IN, st=Maharashtra,
2.5.4.20=637145fd393d6d5c713e94e6da7bc6bee23011448b7fc64d138630b9c76ae7a2, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI,
serialNumber=fcf7172a73579b34fa622983d8fb647780fbef1d35a1ca975955eb9193f3f800, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPT, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=SANJAY AUDUMBAR DHARURKAR
Date: 2020.10.12 15:56:42 +05'30'

**(संजय औ.धारुरकर)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१. संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२. संचालक, महाराष्ट्र राज्य तंत्र शिक्षण मंडळ, ३०५, शासकीय तंत्रिकेनेतन इमारत,४९, खेरवाडी,अलियावर जंग मार्ग, बांद्रा (पूर्व), मुंबई ४०००५१
३. सहसंचालक, तंत्रशिक्षण, विभागीय कार्यालय, (संचालक, तंत्र शिक्षण यांच्यामार्फत).
४. कुलसचिव, संबंधित विद्यापीठ (संचालक,तंत्र शिक्षण यांच्यामार्फत)
५. कुलसचिव, डॉ.बाबासाहेब आंबेडकर तंत्रशास्त्र विद्यापीठ, लोणेरे, रायगड
६. प्राचार्य, विलासराव देशमुख फौंडशन ग्रुप ऑफ इन्स्टिट्युशन्स, लातूर (संचालक, तंत्र शिक्षण यांच्यामार्फत)
७. अतिरिक्त सचिव (तांत्रिक), भारत सरकार, अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषद, ७ वा मजला, चंद्रलोक भवन, जनपथ, नवी दिल्ली - ११० ००१.
८. सहायक शिक्षण सल्लागार (तांत्रिक), भारत सरकार, मनुष्यबळ विकास मंत्रालय (शिक्षण विभाग), नवी दिल्ली.
१०. विभागीय अधिकारी, अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषद, पश्चिम विभागीय कार्यालय, इंडस्ट्रियल इन्शुरन्स बिल्डींग, २ रा मजला, चर्चगेट, मुंबई.
११. निवड नस्ती/तांशि-४